पोलीसांना माहिती देणा-या खब-यांची नक्षलवाद्यांकडून हत्या झाल्यास/कायमचे अपंगत्व आल्यास वावयाच्या अर्थसहाय्याबाबत.

महाराष्ट्र शासन

शासन निर्णय क्रमांक -एनएएस ०८०९/प्र.क्र ४११/विशा-१-ब गृह विभाग,

मंत्रालय, मुंबई-४०००३२,दिनांक - २२ सप्टेंबर, २००९

वाचा - शासन निर्णय, क्र.एनएएस-२००२/प्र.क्र.१८१/भाग-३ /विशा-१ ब, दि.२५ फेब्रुवारी,२००४

पोलीसांना माहिती देण्या-या खब-यांची. नक्षलवाद्यांच्याकडून हत्या झाल्यास अथवा त्यांना कायमचे अपंगत्व आल्यास अर्थ सहाय्य देण्याचा प्रश्न शासनाचे विचाराधीन होता. याबाबत शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे:-

शासन निर्णय :-

(१) पोलीसांना माहिती देणा-या खब-याची नक्षलवाद्यांकडून हत्या झाल्यास त्याच्या वारसांना ५ लाख रुपये इतके अर्थ सहाय्य देण्यात यावे.

(२) पोलीसांना माहिती देणा-या खब-यास नक्षलवाद्यांच्या हल्ल्यात कायमचे अपंगत्व आल्यास ३ लाख रुपये इतके अर्थ सहाय्य देण्यात यावे.

२. वरीलप्रमाणे अर्थसहाय्य खालील अटींच्या पूर्ततेनंतर देण्यात यावे :-

(१) खबऱ्याची पोलीस अभिलेखावर नोंद असणे आवश्यक आहे.

(२) खबऱ्याची हत्या होण्यापुर्वी अथवा कायमचे अपंगत्व येण्यापुर्वी पोलीसांसाठी खब-यांचे नियमीत काम करीत असला पाहिजे.

(३) खबऱ्याची हत्या झाल्याचे किंवा नक्षलहल्ल्यात कायमचे अपंगत्व पोलीसांना खबर दिल्यामुळे आले असल्याचे विहित चौकशीअंती आढळून आले असले पाहिजे.

३. याबाबतचा खर्च "२०५५ पोलीस १०९-जिल्हा पोलीस (००) (०१) जिल्हा पोलीस दल (२०५५०१६८) ४१-सहाय्यक अनुदाने" - या लेखाशिर्षाखाली खर्ची घालण्यात यावा व तो मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. ही योजना संबंधित जिल्हा पोलीस अधीक्षकांमार्फत राबविण्यात येईल.

५. हे आदेश वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४२०/०९/व्यय-७ दिनांक ०७.९.२००९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

६. तसेच हे आदेश महाराष्ट्र शासनाच्या वेब साईटवर देण्यात आले असून त्याचा संकेतांक क्रमांक २००९०९२२१५०९२१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( अं.शा.घार्गे )
शासनाचे उप सचिव

प्रति,

१) पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य
२) पोलीस महासंचालक (अभियान) महाराष्ट्र राज्य, मुंबई
३) विशेष पोलीस महानिरिक्षक, नागपूर परीक्षेत्र, नागपूर
४) विशेष पोलीस महानिरिक्षक, अमरावती परिक्षेत्र, अमरावती
५) विशेष पोलीस महानिरिक्षक औरंगाबाद परिक्षेत्र, औरंगाबाद
६) पोलीस उपमहानिरिक्षक, गडचिरोली
७) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, लेखा परीक्षा मुंबई(१), मुंबई
८) महालेखापाल, लेखापाल लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा महाराष्ट्र राज्य(२), नागपूर
९) जिल्हाधिकारी- गडचिरोली, चंद्रपूर,भंडारा,गोंदिया,नांदेड,यवतमाळ
१०) पोलीस अधीक्षक -गडचिरोली, चंद्रपूर,भंडारा,गोंदिया,नांदेड,यवतमाळ
११) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१२) कार्यासन वीयुडी-१, गृह विभाग,मंत्रालय,मुंबई
१३) निवडनस्ती, विशा-१ ब , गृह विभाग